**हिंगोली जिल्ह्यातील कळमनुरी व वसमत तालुक्यातील दोन योजनाबाह्य रस्त्यांचा ग्रामीण मार्ग म्हणून रस्ते विकास योजना २००१-२१ मध्ये समाविष्ट करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः रवियो-२०१८/प्र.क्र.१७६/नियोजन-२**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२**
**दिनांक- २० डिसेंबर, २०१८.**

**पहावे** :-१) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, औरंगाबाद यांचे पत्र क्र.मुअऔ/का-१४/प्रआ/रवियो-०१-२१/५४९३ दि. १२/११/२०१७.

**प्रस्तावना :-**

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, औरंगाबाद यांचेकडून संदर्भाधीन पत्रान्वये हिंगोली जिल्ह्यातील कळमनुरी तालुक्यातील मौजे सिंदगी ते वापटी वसमत तालुका सीमेपर्यंत रस्ता (१.६०० कि.मी.) व वसमत तालुक्यातील मौजे वापटी ते सिंदगी कळमनुरी तालुका सीमेंपर्यंत रस्ता (३.८०० कि.मी.) या दोन रस्त्यांचा ग्रामीण मार्ग म्हणून रस्ते विकास योजना २००१-२१ मध्ये समाविष्ट करण्याबाबतचा प्रस्ताव शासनास प्राप्त झाला आहे.

सदर रस्त्यांमुळे हिंगोली जिल्ह्यातील बोल्डा (बाजार), वारंगा (फाटा) कळमनुरी, (आखडा) बाळापुर, वसमत, या महत्त्वाच्या असणाऱ्या बाजारपेठा जोडल्या जाणार आहेत. तसेच ऊस वाहतूकीच्या व दळणवळणाच्या दृष्टीने महत्त्वाचे रस्ते आहेत. सदर रस्ते रस्ते विकास योजना २००१-२१ मध्ये समाविष्ट करण्याबाबत जिल्हा परिषद, हिंगोली यांची मागणी आहे. सदर रस्त्याचे महत्व विचारात घेता हे रस्ते रस्ते विकास योजना २००१-२१ मध्ये ग्रामीण मार्ग म्हणून समाविष्ट करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय :-**

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, औरंगाबाद यांचा प्रस्ताव व जिल्हा परिषद, हिंगोली यांची मागणी विचारात घेऊन, हिंगोली जिल्ह्यातील,

१) कळमनुरी तालुक्यातील **मौजे सिंदगी ते वापटी - वसमत तालुका सीमेंपर्यंत रस्ता साखळी** क्र. ०/०० ते १/६० (१.६०० कि.मी.) हा रस्ता **ग्रामीण मार्ग क्र.१०४**

**२)** वसमत तालुक्यातील **मौजे वापटी ते सिंदगी कळमनुरी तालुका सीमेंपर्यंत रस्ता साखळी** क्र. ०/०० ते ३/८० (३.८०० कि.मी.) हा रस्ता **ग्रामीण मार्ग क्र.१२१** म्हणून रस्ते विकास योजना २००१-२१ मध्ये समाविष्ट करण्यात येत आहे.

परिणामी, हिंगोली जिल्ह्यातील **ग्रामीण मार्ग** दर्जाच्या रस्त्यांच्या लांबीमध्ये **५.४०० कि.मी.** इतकी वाढ होऊन जिल्ह्यातील ग्रामीण मार्गांची एकुण लांबी (१९०९.००+५.४००) म्हणजेच **१९१४.४०० कि. मी** इतकी होईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१२२०१६४०३८५४१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swaroop Tukaram Raipure

Digitally signed by Swaroop Tukaram Raipure
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2923930fb1a491b85ab7752c1dc4f2e3b8db33e2a8a322ed2dcfb496a3a97175, serialNumber=427875b948dcfc3f94a33993f9f923cb42f66fb0e5e2c213e8a174114e57cc46, cn=Swaroop Tukaram Raipure
Date: 2018.12.20 16:48:43 +05'30'

**(स्वरूप रायपुरे)**

उप अभियंता तथा कार्यासन अधिकारी,

महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, औरंगाबाद (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)
२) उप सचिव,ग्रामविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) विभागीय आयुक्त, औरंगाबाद.
४) अधिक्षक अभियंता,सार्वजनिक बांधकाम मंडळ,उस्मानाबाद (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करण्यात यावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)
५) जिल्हाधिकारी, हिंगोली.
६) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, हिंगोली.
७) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, हिंगोली
८) संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
९) रस्ते विकास योजना २००१-२०२१ ची नस्ती.
१०) निवडनस्ती.